**श्री.चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांना शासन सेवेतून निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः H.D.-12012/20/2024-ACS-MHD-Home Department**
दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०९ मे, २०२४

**वाचा :-**

**अपर पोलीस महासंचालक (आस्थापना), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय यांचे पत्र क्रमांकः** पोमसं/२-अ/कसुरी-सहा. समादेशक चंद्रकांत पारसकर/२२/२०२१, दिनांक ०७ मे, २०२४.

**शासन आदेश :-**

ज्या अर्थी श्री.चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांच्याविरूध्द पश्चिम देवपूर पोलीस ठाणे, धुळे येथे गु.र.क्रमांक १५२/२०२४, भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम, १९८८ चे कलम ७ अन्वये गुन्हा दाखल आहे.

ज्याअर्थी श्री. चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांचेविरुध्द फौजदारी गुन्ह्याबाबतचे प्रकरण अन्वेषनाधीन आहे आणि सदर गुन्ह्यात श्री. चंद्रकांत पारसकर यांना दिनांक २३/०४/२०२४ ते दिनांक २५/०४/२०२४ या कालावधीत पोलीस

कोठडी रिमांड आणि त्यानंतर दिनांक २६/०४/२०२४ ते दिनांक ३०/०४/२०२४ या कालावधीत कारागृहात न्यायालयीन अभिरक्षेत ठेवण्यात आले होते.

त्याअर्थी आता महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम ४ च्या पोटनियम (एक) अन्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून याद्वारे उक्त श्री. चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांना उक्त नियमाच्या कलम ४ (१) (क) च्या आणि कलम ४ (२) (अ) च्या तरतूदीनुसार अटकेच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक २३/०४/२०२४ पासून शासन सेवेतून निलंबित करण्यात येत आहे.

त्यानुसार असेही आदेश देण्यात येत आहेत की, निलंबनाच्या कालावधीत श्री. चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकलेल्या काळातील वेतन) नियम १९८१ मधील नियम ६८ (एक) (अ) नुसार निर्वाह भत्ता व त्यावरील अनुज्ञेय महागाई भत्ता देण्यात यावा.

शासन आणखी असेही आदेश देत आहेत की, जोपर्यंत निलंबनाचे आदेश अस्तित्वात असतील तोपर्यंत श्री. चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांचे मुख्यालय समादेशक कार्यालय, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे हे राहील. श्री. चंद्रकांत बाबुराव पारसकर यांना समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे यांच्या पूर्वपरवानगीशिवाय मुख्यालय सोडता येणार नाही. समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे यांच्या पूर्वपरवानगीशिवाय त्यांनी मुख्यालय सोडल्यास ती त्यांची गैरवर्तणूक ठरेल व त्या कारणासाठी वेगळ्या शिस्तभंगाच्या कारवाईस ते पात्र ठरतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 202405091633076829 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2024.05.09 18:57:19 +05'30'

**(चेतन निकम)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.चंद्रकांत बाबुराव पारसकर, सहायक समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्रमांक ६, धुळे अंतर्गत महाराष्ट्र राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे.
(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक ६, धुळे.
४. अवर सचिव, पोल-१ (अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती (कार्यासन पोल-२)